**गोंड गोवारी समाजाच्या निवेदनांवर अभ्यास करण्यासाठी मा. उच्च न्यायालयाच्या निवृत्त न्यायाधिशांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. एसटीसी २१२४/प्र.क्र.४२/का. १०**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०३ एप्रिल, २०२४

**वाचा** : आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक एसटीसी २१२४/प्र.क्र.४२/का. १० दिनांक ०६ मार्च २०२४

**प्रस्तावना :-**

मा. उपमुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि. १० फेब्रुवारी, २०२४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार गोंड गोवारी समाजाच्या निवेदनांच्या अनुषंगाने अभ्यास करण्यासाठी मा. उच्च न्यायालयाच्या सेवानिवृत्त न्यायाधिशांच्या अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे समिती गठीत करण्यात आलेली आहे.

१. श्री. के. एल. वडणे, निवृत्त न्यायाधिश मा. उच्च न्यायालय — अध्यक्ष
२. सह संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे — सदस्य सचिव

२. सदर समितीचे अध्यक्ष मा. न्यायमुर्ती श्री. के. एल. वडणे, निवृत्त न्यायाधिश मा. उच्च न्यायालय (निवृत्त) यांचे मानधन निश्चित करणे व इतर सोयीसुविधा पुरविण्याची बाबत शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने त्याना मानधन व इतर सोयीसुविधा पुरविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

शासन निर्णय :

१. सदर समितीचे अध्यक्ष मा. न्यायमुर्ती श्री. के. एल. वडणे, निवृत्त न्यायाधिश मा. उच्च न्यायालय (निवृत्त) यांना प्रतिमाह रु.४,००,०००/- (अक्षरी रुपये चार लाख फक्त) इतके मानधन अनुज्ञेय राहील.
२. समितीचे अध्यक्ष यांना पूर्ण वेळ वाहन व वाहन चालक (इंधन खर्चासह) अनुज्ञेय राहील.
३. समितीचे अध्यक्ष यांना समितीच्या कामानिमित्त दौऱ्याकरिता विमान प्रवास भाडे अनुज्ञेय राहील.
४. समितीचे अध्यक्ष यांना समितीच्या कामानिमित्त विविध ठिकाणी शासकीय दौऱ्यावर गेल्यास राजशिष्ठाचार प्रमाणे त्यांची निवास व भोजन व्यवस्था शासकीय विश्रामगृह येथे करण्यात येईल.
५. समितीच्या कामासाठी आवश्यक अधिकारी/कर्मचारीवृंद व साधनसामुग्री (संगणक, प्रींटर, स्कॅनर) उपलब्ध करुन देण्यात येईल.

सदर समितीचे अध्यक्ष यांना मानधन व इतर भत्ते यासाठी येणारा खर्च, आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी "मागणी क्र. टी ५, २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, (०२) जनजाति क्षेत्राबाहेरील उपयोजना, (०२) (२४) अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती (कार्यक्रम), १३ कार्यालयीन खर्च (२२२५ ४१२२)" या लेखाशिर्षाखली उपलब्ध होणाऱ्या तरतूदीमधून खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४०३१७१५५३७२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9CE356F38C6A70A8FFDE299AD6627F48BD01E875A7ACA38BD139B0CC5367E62D, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2024.04.03 17:26:29 +05'30'

**( उदय ग. गवस )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त/गृह), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
४. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
५. मा. श्री के. एल. वडणे, सेवानिवृत्त न्यायाधिश, उच्च न्यायालय, मुंबई
६. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
७. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
८. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर/अमरावती
९. सह संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१०.सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती (सर्व)
११.निवडनस्ती (का.१०)